भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर या कार्यालयाच्या आस्थापनेवरील उपसंचालक गट-अ संवर्गातील बदल्यामध्ये अंशत: बदल करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## उद्योग, उर्जा व कामगार विभाग
### शासन आदेश क्र.एमएनए- ०६१८/ प्र.क्र.६१/उद्योग-९

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०९ जानेवारी २०२०

<u>वाचा</u>: १) शासन निर्णय क्र.एमएनए-०११९/प्र.क्र.०६/ उदयोग-९, दि.३१.०७.२०१९
२) रिट याचिका क्र.७२७०/२०१९ मध्ये मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर, यांनी दि.१५.११.२०१९ रोजी दिलेला न्यायनिर्णय.

**शासन निर्णय:**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदी नुसार व सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांच्या आस्थापनेवरील उपसंचालक, गट-अ या सवंर्गातील अधिका-यांच्या बदल्यांच्या दि.३१.०७.२०१९ रोजीच्या आदेशामध्ये संदर्भाधीन क्र.२ येथील मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर, यांनी दि.१५.११.२०१९ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानूसार अंशत: बदल करण्यात येत आहे. त्यानुषंगाने खालील तक्त्यामध्ये नमूद केलेप्रमाणे उपसंचालक, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नांवासमोरील रकाना क्र. ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहेत:-

**पदनाम: उपसंचालक, गट अ**

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.से.पु.आवळे | उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, नागपूर | उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, नागपूर (दि.३१.०७.२०१९ चा शासन आदेश कायम ठेवण्यात येत आहे.) |
| २ | श्रीम.मी.ना.निखारे | उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, चंद्रपूर | मुख्य कार्यालय, नागपूर |

२. वरील नमुद करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या बदलीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. तसेच सर्व संबंधीतांना बदलीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यासाठी संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांनी स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन त्यांना त्वरीत कार्यमुक्त करावे व त्याबाबतचा कार्यपूर्ती अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२००१०९१५४०२४७७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by SAGUNA GANESH THENGIL
Date: 2020.01.09 15:27:09 +05'30'

**( सगुना काळे-ठेंगील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२ नागपूर.
४. उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय,भूविज्ञान व खनिकर्म, नागपूर / चंद्रपूर
५. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव / विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
६. मा. मंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव / विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
७. मा.राज्यमंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई ३२.
८. प्रधान सचिव (उद्योग), यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग. मंत्रालय, मुंबई ३२.
९. उप सचिव (खनिकर्म), यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१०. संबंधित अधिकारी-संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांच्या मार्फत